कार्यालयीन अभिलेख्यांचे मायक्रोफिल्मींग करणेबाबत दरकरार करणे.

GR-200407315352 K1001-1100

महाराष्ट्र शासन,
उद्योग, उर्जा व कामगार विभाग,
पूरक निर्णय क्र. भाखसं-1095/2734/उद्योग-6,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 28 डिसेंबर, 1995.

वाचा:- शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भाखसं-1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी, 1992.

## शासन निर्णय

विविध शासकीय, निमशासकीय कार्यालयांतून अभिलेख जतन करण्यासाठी लागणा-या जागा व ती व्यवस्थित राहण्यासाठी होणारे परिश्रम विचारात घेता या अभिलेख जतनासाठी अभिलेख्यांचे मायक्रोफिल्मींग करण्याची पध्दत अवलंबविणे श्रेयस्कर वाटते. या पध्दतीनुसार महत्वाच्या कागदपत्रांची छोटी पटल (फिल्म) तयार करुन ती वर्षानुवर्षे राखून ठेवता येऊ शकते. हे पटल केवळ 35 मि.मी. आकाराचे असल्यामुळे ते जतन करण्यास जागाही फारशी लागणार नाही, आणि अनेक वर्षे सर्व कागदपत्रे व्यवस्थितरित्या जतन करुन ठेवता येतील. या पटलाच्या कमी किंमतीत प्रतीही काढून घेता येतील आणि या पटलाचे वाचन करण्यासाठी "रिडर प्रिंटरची" आवश्यकता असल्यामुळे गुप्त असे अभिलेख सहजरित्या कोणालाही वाचता येणार नाहीत. या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, अभिलेख्यांचे मायक्रोफिल्मींग करणे ही बाब प्रायोगिक तत्वावर एक विशेष बाब म्हणून दर करारावर घेण्यात यावी व ती दर करारासाठी मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेकडे सोपविण्यात यावी. या निर्णयानुसार हा दर करार मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेमार्फत करावयाचा असल्याने दिनांक 2 जानेवारी, 1992 च्या शासन निर्णयात परिशिष्ट 4 मध्ये बाब क्र.33 नंतर बाब क्र.34 पुढीलप्रमाणे नमूद करावी.

बाब क्रमांक 34 - "कार्यालयीन अभिलेख्यांचे मायक्रोफिल्मींग करणे"

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सौ.अ.वि.राराविकर,
कार्यासन अधिकारी.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव.
मुख्य मंत्री यांचे सचिव.
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक.
प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिका
सर्व मंत्रालयीन विभाग,